युनियन बँक ऑफ इंडिया, पुणे या बँकेकडून सदिच्छा देणगी स्वरुपात मिळालेल्या वाहनास **विशेष बाब** म्हणून कार्योत्तर मंजूरी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक मासैक-२०१०/प्र.क्र.३०४/का.२८,
मंत्रालय, मुबंई-४०० ०३२.
दिनांक : १५ जुलै, २०११.

**वाचा :** सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक १०००५/सैकवि ७/७१२९, दिनांक २२ डिसेंबर, २०१० व दिनांक ३० मार्च, २०११.

**प्रस्तावना :**

माजी सैनिकांच्या विधवा पत्नी, वीरमाता/पिता/पत्नी इ. लाभधारक संपूर्ण महाराष्ट्रातून पुणे येथील कमांड हॉस्पिटलमध्ये उपचारासाठी येतात. त्यांच्या राहण्याची/जेवणाची मूलभूत सुविधा सैनिक कल्याण विभाग, पुणे यांचेकडील विश्रामगृहात माफक दरात केली जाते. अशा रुग्णांना विश्रामगृह ते हॉस्पिटल येथे येण्या-जाण्यासाठी युनियन बँक ऑफ इंडिया, पुणे या बँकेने सामाजिक बांधिलकेतून देणगी स्वरुपात Tata Winger Dix Flat Roof BS- ३ १३+१ with dual AC हे रु.६,८८,९८८/- (रु. सहा लक्ष अठ्ठयाऐंशी हजार नऊशे अठ्ठयाऐंशी फक्त) इतक्या किंमतीचे वाहन सैनिक कल्याण विभाग, पुणे यांना उपलब्ध करुन दिलेले आहे. सदर वाहन हे देणगी स्वरुपात प्राप्त झालेले असल्याने सदर देणगी स्वीकारण्यास कार्योत्तर मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :**

युनियन बँक ऑफ इंडिया, पुणे या बँकेने सदिच्छा देणगी स्वरुपात दिलेले वाहन देणगी म्हणून स्वीकारण्याच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची कार्योत्तर मंजूरी प्रदान करण्यात येत आहे :

(१) सदर वाहनासाठी वाहन चालकाचे स्वतंत्र पद निर्माण केले जाणार नाही

(२) सदर वाहनाचा देखभाल, दुरुस्ती व इंधनावरील खर्च लाभधारक माजी सैनिकांकडून अल्प प्रमाणात शुल्क आकारुन त्यामधून भागविण्यात येईल. यासाठी शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

२.    हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनाौपचारीक संदर्भ क्रमांक - अनौसं २९०/विनियम, दिनांक ०३.०६.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार  निर्गमित करण्यात येत आहे.

३.    हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक  २०११०७१५१७१६१०००१ असा आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(वि. द. आठवले )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (२० प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे
सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी,
वित विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई ३२,
निवड नस्ती (२ प्रती)